**शासकीय / निमशासकीय सेवेतील नियुक्त्यांसाठी देण्यात आलेल्या सर्वोच्च प्राधम्य व पसंतीक्रमाबाबत निर्गमित करण्यात आलेल्या आदेशांमध्ये एकसूत्रता व पारदर्शकता ठेवण्याच्या दृष्टीने शासनास शिफारशी करण्यासाठी समितीचे गठन करण्याबाबत**

महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्र.न्याप्र-१००३/११४/प्र.क्र.८२/०३/१६-अ,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १५ नोव्हेंबर, २००३

प्रस्तावना :-

महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद खंडपीठ यांच्या पुढील मूळ अर्ज क्र.७२०/२००१ संदर्भात न्यायाधिकरणाने दि.१८ नोव्हेंबर,२००२ रोजी दिलेल्या न्यायनिर्णयान्वये शासनाने प्रकल्पग्रस्तांना शासकीय सेवेत दिलेले सर्वोच्च प्राधम्य व इतर घटकांना दिलेले पसंतीक्रम या संबंधातील आदेशांमध्ये सुधारणा करुन एकसूत्रता व पारदर्शकता ठेवण्याच्या दृष्टीने कार्यवाही करण्याबाबत प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग यांना निर्देश दिले होते. यांस अनुसरुन याबाबत शासनास शिफारशी करण्यासाठी एका समितीची नियुक्ती करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

शासन निर्णय :-

वरील प्रस्तावनेत उल्लेख केलेल्या विषयाच्या अनुषंगाने शिफारशी करण्यासाठी श्री.ज.स.घाणेकर, निवृत्त उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग यांची एक सदस्य समिती नेमण्यात येत आहे.

या समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील.

१) शासकीय / निमशासकीय सेवेत नियुक्त्यांमध्ये काही घटकांना देण्यात आलेल्या सर्वोच्च प्राधम्य व पसंतीक्रम या संबंधातील शासन निर्णय / परिपत्रके इ. चा अभ्यास करणे.

२) महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, औरंगाबाद खंडपीठ यांनी दि.१८.११.२००२ रोजी दिलेल्या निदेशानुसार उपरोक्त आदेशान्वये देण्यात आलेल्या सवलतींनुसार नियुक्त्यांच्या पद्धतीत एकसूत्रता व पारदर्शकता ठेवण्यासाठी कोणत्या व कशा सुधारणा करता येतील याबाबत रुपरेखा ठरविणे.

३) या अनुषंगाने शासनास शिफारशी करणे.

समिती या आदेशाच्या दिनांकापासून दोन महिन्यात प्रधान सचिव (सेवा) यांना अहवाल सादर करेल. या कार्यवाहीच्या अनुषंगाने समिती आवश्यक असेल तर मंत्रालयात उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग/का.१६-अ यांच्या दालनात बैठका घेईल. अवर सचिव,

का.१६-अ हे समितीस संबंधित आदेशांच्या प्रती तसेच कागदपत्रे पुरवितील. तसेच इतर अनुषंगीक सुविधा सामान्य प्रशासन विभागामार्फत उपलब्ध केल्या जातील.

या कामासाठी श्री.ज.स.घाणेकर यांना दरमहा एकत्रित मेहनताना रु.१०,०००/- देण्यात येईल. त्यामध्ये इतर कोणतेही भत्ते अनुज्ञेय असणार नाहीत. हा खर्च मागणी क्र.ए-४,२०५२ सचिवालय सर्वसाधारण सेवा, ०९० सचिवालय, (००) (०१) सामान्य प्रशासन विभाग, १२ व्यावसायिक व विशेष सेवा या लेखाशीर्षाखाली २००३-२००४ या वित्तीय वर्षाकरीता सुधारित अंदाजात मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात येईल.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.८२५/०३/व्यय-४, दि.१०.१०.२००३ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

द.दा.देशपांडे

( द.दा.देशपांडे )

अवर सचिव,महाराष्ट्र शासन.

प्रत :

श्री.ज.स.घाणेकर,३/९०, अक्षयानंद, शैलेंद्र नगर,स्वामी विवेकानंद मार्ग,
दहिसर (पूर्व), मुंबई-४०० ०६८.
उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, का.१६-अ.
उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग, का.२५.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, का.२५ व का.२६(रोख शाखा)
अवर सचिव, वित्त विभाग, व्यय-४,
प्रधान सचिव (सेवा), सा.प्र.वि. यांचे स्वीय सहायक,
निवड नस्ती.

D:\Deshpande\Misc\4